**जलस्वराज्य - २ कार्यक्रम.**
अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करुन उच्च दर्जाच्या, गुणवत्तापूर्ण तसेच शाश्वत पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधा यशस्वीरित्या राबविण्याकरिता तांत्रिक बाबींविषयक धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी **"राज्यस्तरीय तांत्रिक समिती"** गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-०५१५/ प्र. क्र. ८५/ वि. सं. क. (तां)/ पापु-११.**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१.
तारीख: ०४ जून, २०१५.

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११०/प्र. क्र. १०४ (अ) / पापु-०७, दि. १७/०३/२०१०.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११०/प्र. क्र. १३० (II) / पापु-०७, दि. ०७/०६/२०१२.
३) सविस्तर प्रकल्प अहवालाबाबत निर्गमित केंद्र शासनाच्या सूचना, दि. २०/२/२०१३.
४) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-१२१३ / प्र. क्र. २०० / पापु-११, दि. ०४/०१/२०१४.
५) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-०२१४ / प्र. क्र. ५५ / पापु-११, दि. ११/०६/२०१४.
६) शासन निर्णय क्रमांकः निशयो-१४१३ / प्र. क्र. ८८ / पापु-०७, दि. ११/०९/२०१४.
७) शासन निर्णय क्रमांक जस्वका-२/०८१४/प्र.क्र. ६४/पापु-११, दि. २५/०२/२०१५.
८) जलस्वराज्य-२ कार्यक्रम मार्गदर्शिका.

**प्रस्तावना :**

राज्यातील ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता सेवांचे नियोजन, अंमलबजावणी, संनियंत्रण व शाश्वतता याबाबत या क्षेत्रातील संस्थांच्या कामगिरीचा दर्जा उंचावणे तसेच शहरालगतच्या भागांमध्ये आणि पाणी गुणवत्ताबाधित व टंचाईग्रस्त भागांमध्ये गुणवत्तापूर्ण व शाश्वत पाणी पुरवठा सेवा पुरविणे, हे जलस्वराज्य-२ कार्यक्रमाचे मुख्य उद्दिष्ट आहे.

या कार्यक्रमांतर्गत राज्यातील १२ जिल्ह्यांमधील गावे / वाड्यांमध्ये उच्च दर्जाच्या सेवा पुरविण्यासाठीचे प्रयोगनिर्देशन (Demonstration) करणाऱ्या योजना आणि टंचाईचे निवारण करणाऱ्या कायमस्वरुपी उपाययोजना राबविण्याकरिता सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी अभियांत्रिकी सल्लागारांची निवड सूची उपरोक्त संदर्भ क्र. ७ मध्ये नमूद शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आली आहे.

सदर शासन निर्णयामध्ये निवड सूचीतील सल्लागारांना सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याकरिता राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मार्गदर्शक सूचना, केंद्र व राज्य शासनाकडून वेळोवेळी निर्गमित केलेले सर्व शासन निर्णय व परिपत्रके तसेच जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षामार्फत वेळोवेळी निर्गमित केल्या जाणाऱ्या मार्गदर्शक सूचना इ. चा आधार घेणे बंधनकारक राहील, असे नमूद करण्यात आले आहे.

तरीदेखील अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करुन उच्च दर्जाच्या पा. पु. व स्व. सुविधा पुरविणे, स्थानिक पातळीवर पाणी व्यवस्थापन करणे, निमशहरी आणि पाणी गुणवत्ताबाधित व टंचाईग्रस्त भागांमध्ये गुणवत्तापूर्ण, शाश्वत व पर्यावरणाला हानिकारक ठरणार नाही अशा पद्धतीने पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधा पुरविणे तसेच पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्रातील कामगिरीचा दर्जा उंचावणे इ. करिता प्रत्येक वेळी शासन निर्णय, परिपत्रके व मार्गदर्शक सूचना इ. नुसार कामे करणे शक्य होणार नाही. याकरिता वेळोवेळी क्षेत्रीय परिस्थितीनुसार योग्य व अचूक निर्णय घेवून आवश्यकता भासल्यास शासनाच्या धोरणात सुसूत्रता आणून पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधा अधिक परिणामकारकरित्या राबविण्यासाठी तसेच तांत्रिक मुद्द्यांबाबतचा अंतिम निर्णय घेण्यासाठी राज्यस्तरीय तांत्रिक समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

वरील बाबींस अनुसरुन पा. पु. व स्व. सुविधा अधिक परिणामकारकरित्या राबविण्यासाठी सर्व योजनांच्या संकल्पनामध्ये एकवाक्यता व सुसूत्रता आणण्यासाठी तसेच आवश्यकता भासल्यास शासनाच्या धोरणात सुधारणा करुन तांत्रिक मुद्द्यांबाबतचा अंतिम निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे **“राज्यस्तरीय तांत्रिक समिती”** गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | उपसचिव तथा प्रकल्प संचालक, पा. पु. व स्व. विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | प्रकल्प व्यवस्थापक, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई. | सदस्य |
| ३. | अधीक्षक अभियंता, विशेष संनियंत्रण कक्ष, सु.स. व प्र.व्य. कक्ष, नवी मुंबई. | सदस्य |
| ४. | अधीक्षक अभियंता, मुख्यालय, म. जी. प्रा., मुंबई. | सदस्य |
| ५. | अधीक्षक अभियंता, म. नि. सं. व स., म. जी. प्रा., मुंबई. | सदस्य |
| ६. | अधीक्षक अभियंता, मीत्रा, नाशिक. | सदस्य |
| ७. | कार्यकारी अभियंता, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई. | सदस्य |
| ८. | उपसंचालक, भू. स. व वि. यंत्रणा, पुणे. | सदस्य |
| ९. | उपअभियंता, सु. स. व प्र. व्य. कक्ष, नवी मुंबई. | सदस्य सचिव |
| १०. | अशासकीय तांत्रिक सल्लागार | सदस्य |

**“राज्यस्तरीय तांत्रिक समिती” ची कर्तव्ये व जबाबदाऱ्या:-**

- ✓ जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधांचे नियोजन व अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करणे.
- ✓ जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत गुणवत्तापूर्ण तसेच शाश्वत पाणी पुरवठा व स्वच्छता सुविधा यशस्वीरित्या राबविण्याकरिता तांत्रिक बाबींविषयक धोरणात्मक निर्णय घेणे.
- ✓ अत्याधुनिक तंत्रज्ञान व पा.पु.व स्व. उपाययोजनांसाठी वापरण्यात येणारे साहित्य इ. ची निवड सूची तयार करणे.
- ✓ निमशहरी गावे / वाड्यांच्या सविस्तर प्रकल्प अहवालांची प्रशासकीय मान्यता व निविदा प्रक्रिया यांबाबत फेरविचार करणे.
- ✓ सर्व गावे / वाड्यांची Satellite Image एकत्रित मागविण्याबाबत शासन स्तरावर योग्य ती कार्यवाही करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०४१५०२५९५४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DHALAPE KALURAM JANU

Digitally signed by DHALAPE KALURAM JANU
DN: CN = DHALAPE KALURAM JANU, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 918028
Date: 2015.06.05 12:55:58 +05'30'

( का. जा. धलपे )

**शासनाचे अवर सचिव**

प्रत :-

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५. मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य (सर्व), महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.

१०. विभागीय आयुक्त (सर्व)
११. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१३. महानगरपालिका आयुक्त (सर्व)
१४. जिल्हाधिकारी (सर्व)
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१८. मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
२०. प्रादेशिक उप संचालक (सर्व), भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा.
२१. मुख्याधिकारी, नगरपालिका (सर्व)
२२. अधीक्षक अभियंता (सर्व), भारत निर्माण कक्ष.
२३. अधीक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
२४. कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
२५. कार्यकारी अभियंता (सर्व), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद.
२६. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
२७. पा. पु. व स्व. विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने, मंत्रालय, मुंबई.
२८. निवड नस्ती (कार्यासन पापु-११)